**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत-PMJVK (पुर्वीचा बहु क्षेत्र विकास कार्यक्रम) लातूर जिल्ह्यातील उदगीर शहर येथील कन्या प्रशाळा येथे उर्दु प्राथमिक व माध्यमिक शाळा इमारत बांधकामासाठी राज्य हिश्श्यातील उर्वरीत अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१७/प्र.क्र.४३/का.७,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - ०२ नोव्हेंबर, २०२१

संदर्भ: -

१. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३/१३(९)/२०१३-PP, दि.२७/०२/२०१६.
२. शासन ज्ञापन, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अ.वि.वि.-२०१७/प्र.क्र.४३/का-७, दि.१४/०६/२०१७.
३. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक अ.वि.वि.-२०१४/प्र.क्र.१४१/का-७, दिनांक ३१/०३/२०१६.
४. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक अ.वि.वि.-२०१४/प्र.क्र.१४१/का-७, दिनांक ३०/०४/२०१६.
५. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.१३/१२७/२०१७-MsDP-MOMA, दि.२८/१०/२०२०.
६. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक अ.वि.वि.-२०१७/प्र.क्र.४३/का-७, दिनांक १५/०१/२०२१.

प्रस्तावना :-

१२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाने (GOI) केंद्रपुरस्कृत प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत-PMJVK (पुर्वीचा-MsDP) अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या गठित शक्तीप्रदान समितीच्या दि.२६/०२/२०१६ रोजीच्या १११ व्या बैठकीत लातूर जिल्ह्यातील उदगीर शहर येथील कन्या प्रशाळा येथे उर्दु प्राथमिक शाळा व माध्यमिक शाळा इमारत बांधकामास रू.२०७.५७ लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास मंजुरी देण्यात आली आहे. शासन ज्ञापन दि. १४/०६/२०१७ अन्वये लातूर जिल्ह्यातील उदगीर शहर येथील कन्या प्रशाळा येथे उर्दु प्राथमिक शाळा व माध्यमिक शाळा इमारत बांधकामास रु.३७२.००/- लाख इतक्या रकमेच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर शाळा इमारत बांधकामाकरीता केंद्र + राज्य हिश्श्याचे प्रमाण ६० : ४० असे आहे. सदर शाळा इमारत बांधकामास दि.३१/०३/२०१६, दि.३०/०४/२०१६ व दि.१५/०१/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये केंद्र + राज्य हिश्श्यातील पहिल्या व दुसऱ्या टप्प्यातील एकूण रू.२०७.५६ लाख (केंद्र हिस्सा रू.१२४.५४ लाख **अधिक** राज्य हिस्सा रू.८३.०२ लाख) इतका निधी विहित अटींच्या अधीनतेने मंजूर करून जिल्हाधिकारी लातूर, यांना वितरीत करण्यात आला आहे.

२. केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत-PMJVK (पुर्वीचा-MsDP) जिल्हाधिकारी,लातूर यांनी उर्वरित राज्य हिश्श्यातील रू.१६४.४४ लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत केलेल्या विनंतीस अनुसरून लातूर जिल्ह्यातील उदगीर शहर येथील कन्या प्रशाळा येथे उर्दु प्राथमिक व माध्यमिक शाळा

इमारत बांधकामासाठी प्रशासकीय मान्यतेनुसार राज्य हिश्यातील उर्वरित रु.१६४.४४ लाख इतका निधी जिल्हाधिकारी, लातूर यांना मंजूर करुन वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रमातंर्गत-PMJVK (पुर्वीचा बहुक्षेत्र विकास कार्यक्रम) जिल्हाधिकारी, लातूर यांनी मागणी केल्यानुसार लातूर जिल्ह्यातील उदगीर शहर येथील कन्या प्रशाळा येथे उर्दु प्राथमिक व माध्यमिक शाळा इमारत बांधकामासाठी प्रशासकीय मान्यतेनुसार रु.१६४.४४ लाख (उर्दु प्राथमिक व माध्यमिक शाळा इमारत बांधकामाची प्रशासकीय मान्यता रू.३७२.०० लाख **वजा** केंद्र + राज्य हिश्श्यातील वितरीत पहिला व दुसरा हप्ता निधी रू.२०७.५६ लाख) लाख इतकी रक्कम जिल्हाधिकारी, लातूर यांना खालील प्रमाणे वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

**जिल्हा-लातूर गट-उदगीर शहर** (रू.लाखात)

| अ. क्र. | कामांचे नाव | प्रकल्प किंमत (केंद्र) | प्रशासकीय मान्यता (राज्य) | वितरीत पहिला हप्ता | | वितरीत दुसरा हप्ता | | प्र.मा.नुसार वितरीत करावयाचा राज्य हिस्सा (स्तंभ क्र.४ वजा स्तंभ क्र.३) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | केंद्र | राज्य | केंद्र | राज्य | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | उदगीर शहर येथील उर्दु प्राथमिक शाळा व माध्यमिक शाळा इमारत बांधकाम. | २०७.५६ | ३७२.०० | ६२.२७ | ४१.५१ | ६२.२७ | ४१.५१ | १६४.४४ |
| | **एकूण** | **२०७.५६** | **३७२.००** | **६२.२७** | **४१.५१** | **६२.२७** | **४१.५१** | **१६४.४४** |

२. उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(९) प्रमाणे सन २०२१-२२ या वर्षात प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (पुर्वीचा-MsDP) लातूर जिल्ह्यातील उदगीर शहर येथील कन्या प्रशाळा येथे उर्दु प्राथमिक शाळा व माध्यमिक शाळा इमारत बांधकामासाठी प्रशासकीय मान्यतेनुसार राज्य हिश्श्यातील उर्वरीत रू.१६४.४४ लाख इतकी रक्कम जिल्हाधिकारी, लातूर यांना सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. सन २०२१-२२ या वर्षात जिल्हाधिकारी, लातूर यांना उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(९) प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरित व संवितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, लातूर यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत लातूर जिल्ह्यातील उदगीर शहर येथील कन्या प्रशाळा येथे उर्दु प्राथमिक व माध्यमिक शाळा इमारत बांधकामासाठी आहरित केलेली रक्कम सदर विकासकामांच्या अंमलबजावणीशी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेस रितसर वितरित करावी.

४. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) उदगीर शहर येथील कन्या प्रशाळा येथे उर्दु प्राथमिक शाळा व माध्यमिक शाळा इमारत बांधकामाच्या अंमलबजावणीकरीता जिल्हाधिकारी,लातूर हे मुख्य नियंत्रक अधिकारी व अंमलबजावणी अधिकारी राहतील.

५. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत - PMJVK (पुर्वीचा-MsDP) मान्यताप्राप्त उर्दु प्राथमिक शाळा व माध्यमिक शाळा इमारत बांधकामाच्या अंमलबजावणीसाठी राज्य हिश्यांतर्गत वितरीत करण्यात आलेला निधी सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून केवळ राष्ट्रीयीकृत बॅकेत उघडण्यात आलेल्या स्वतंत्र बॅक खात्यामध्ये ठेवण्यात यावा.

६. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता जिल्हाधिकारी,लातूर यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी जिल्हाधिकारी,लातूर यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

७. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) मान्यताप्राप्त शाळा इमारत बांधकामासाठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) विहित नमुन्यात, अद्ययावत छायाचित्रासह संबंधीत अंमलबजावणी यंत्रणेने जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील विकासकामांची माहिती व छायाचित्रे वेळोवेळी upload करावी.

८. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या दि.१४/१२/२०१५ रोजीच्या बैठकीतील सूचनानुसार प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमाअंतर्गत (PMJVK) ज्या प्रयोजनाकरिता निधी मंजूर करुन वितरित केला आहे, त्याच प्रयोजनार्थ सदर निधी खर्च करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अन्य प्रयोजनाकरिता सदर निधी खर्च केल्यास सर्व संबंधित अधिकाऱ्यांवर विनाविलंब कारवाई करण्यात येईल.

९. सदर योजनेंतर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५ ए ५४३), ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" तसेच राज्य हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१)(१४) प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५ ए २३१) ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

१०. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४/०६/२०२१ व दि.१४/१०/२०२१ अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यात आलेल्या अधिकांरानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२१११०३१७००४३३११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH
MADHAVRAO
SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2021.11.03 17:04:28 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. अ.मु.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,मंत्रालय,मुंबई.
३. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, औरंग़ाबाद.
५. जिल्हाधिकारी, लातूर.
६. मुख्याधिकारी, नगरपरिषद, लातूर.
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.
९. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.
१०. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड.
११. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, लातूर.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर.
१३. वित्त विभाग (अर्थसंकल्प - ४/ व्यय - १) मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग (कार्या.१४७१).
१५. निवड नस्ती, (का.७).